**राज्यात विकल्या जाणाऱ्या प्रत्येक वस्तू, संगणकीय प्रणाली माहिती तंत्रज्ञान उपकरण, भ्रमणध्वनी इत्यादी मध्ये राजभाषा मराठीचा वापर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन परीपत्रक क्रमांक :- कपासू-२०१४/प्र.क्र.९४/भाषा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगूरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांख : - ९ सप्टेंबर, २०१४

**वाचा :-**

१) **मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. - मभावा-१०११/प्र.क्र.७८/२०११/भाषा-२, दि.१०.०५.२०१२.**
२) **मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. - युनिकोड-२०१२/प्र.क्र.१७८/भाषा-२, दि.२७.१२.२०१२**
३) **मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.- मभावा-१०११/प्र.क्र.७८/भाषा-२, दि.२९.०१.२०१३.**
४) **मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. - मभावा-२०१४/१४९/प्र.क्र.७३/भाषा-२, दि.२०.०८.२०१४.**

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ मधील तरतूदीनुसार दिनांक १ मे, १९६६ पासून वर्जित प्रयोजने वगळता सर्व कामकाज मराठीतून करणे बंधनकारक करण्यात आले आहे. शासकीय कार्यालयाप्रमाणे शासनाच्या अंगीकृत व्यवसायांनी वर्जित प्रयोजने वगळता सर्व कामकाज मराठीतून करावयाचे आहे. या आदेशाची अंमलबजावणी काटेकोरपणे होण्याच्या दृष्टीने शासनाकडून वेळोवेळी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये सूचनाही देण्यात आलेल्या आहेत. तथापि, केंद्र/राज्य शासनाची काही कार्यालये/अंगीकृत व्यवसायांच्या कार्यालयाचे कामकाज मराठीतून होत नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास येत आहे. राज्यात उत्पादित केल्या जाणाऱ्या तसेच विकल्या जाणाऱ्या प्रत्येक उत्पादित वस्तू, संगणकीय प्रणाली, माहिती तंत्रज्ञान उपकरणे, भ्रमणध्वनी इत्यादी मध्ये राजभाषा मराठीचा वापर होत नसल्याचे दिसून येत आहे.

राज्यात उत्पादित केल्या जाणाऱ्या तसेच विकल्या जाणाऱ्या प्रत्येक भ्रमणध्वनी उपकरणात मराठी भाषा वापरण्याची, वाचण्याची व टंकलिखित करण्याची सोय असल्याच्या सूचना संबंधीतांना देण्यात येत आहेत. तसेच राज्यात विकली जाणारी प्रत्येक संगणकीय प्रणाली, माहिती तंत्रज्ञान उपकरण यांच्यात सहायक धारीका, माहिती पुस्तक, मार्गदर्शिका मराठीतून उपलब्ध करुन घेण्यासाठी नियम करण्याच्या

सूचना तसेच सदर सोयी कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने आवश्यकता भासल्यास निरिक्षण व तपासणी केंद्राची उभारणी करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

सदर परिपत्रकान्वये सर्व प्रशासकीय विभागांना सूचना देण्यात येत असून सर्व प्रशासकीय विभागांकडून त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये, मंडळे, महामंडळे, प्राधिकरणे, सार्वजनिक उपक्रम यांना याबाबत सूचना देण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२५१२१२१४२९३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vrushali Vasant Sawant

Digitally signed by Vrushali Vasant Sawant
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vrushali Vasant Sawant
Date: 2014.09.25 12:25:17 +05'30'

**वृषाली सावंत**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४) मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मा. मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) सर्व मंत्रालयीन विभाग,
८) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
९) सर्व जिल्हाधिकारी,
१०) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
११) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, (पत्राने)
१२) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने)
१३) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, विधान भवन, मुंबई,

१४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),

१५) मा. लोक आयुक्त / उप लोक आयुक्त, मुंबई

१६) महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,

१७) महालेखापाल - १ (लेखा परीक्षा), मुंबई,

१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

२०) भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२१) सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई

२२) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

२३) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई

२४) निवडनस्ती.